: अतिथी संपादक :
सुनिती लिमये (पुणे)

: संपादक मंडळ :
सोनाली घाटपांडे (पुणे)
भारती सरमळकर (मुंबई)
स्वप्ना कोल्हे (नाशिक)
सचिन काकडे (मुंबई)
शशिकांत रणवरे (ठाणे)
सारंग भणगे (पुणे)
मनातल्या मनात (पुणे)

: संपर्क :
ई साहित्य प्रतिष्ठान
जी ११०२, ईटर्निटी,
मॅरेथॉन चौक
ठाणे – ४००६०४
९८६९६७४८२०
हा अंक विनामुल्य मिळण्यासाठी
तसेच सूचना, अभिप्राय
व प्रतिक्रियांसाठी
netaksharee@gmail.com



सप्रेम नमस्कार ,

कविता ! किती साधी सोपी , बस! दोन तीन शब्दांची

तुमची माझी आणि हळुवार नात्यांची .........

लहानपणापासून थोडी कवितेच्या जवळ होते म्हणजे माझी आई , विमल लिमये कवयित्री , गायिका. कवितेचा वारसा कदाचित माझ्या आजीकडून आला असावा. त्या काळात पाळणे, मंगलाष्टका करून देत असे ती, माझ्या लहानपणाच्या कविता अगदी मुलांचे भावविश्व जपणा-या , विषय खूप निरागस पण कधीकधी शब्दात मांडता यायचे नाहीत मग आईला लिहिलेल दाखवायचं आणि ती कुठे बद्‌ल सुचवायची , मदत करायची. कात्यशिल्प ही पहिली पुण्यातली पहिली कविंची संस्था. तिथे आईबरोबर मी पण. लहानपणापासून , लोक कविता वाचतात कशी , सादरीकरण करतात कस, गीत असेल तर कसं , हे हळूहळू कळायला लागलं. नंतर शिक्षणाच्या, करीयरच्या मागे धावताना कविता जी निसटली ती त्यानंतर तब्बल २५ वर्षांनी सापडली. मग मात्र कवितेचा प्रवास सुरु राहिला. माझ्या कवितेतले बदल, आज मागे वळून पहाटे तेव्हा जाणवतात. साधे शब्द, साधी मांडणी अशी एकंदर माझी धाटणी राहिली. शब्दांच प्रभावीपण मांडण जसा सोप तस , थोडं अवघडही.

एक मात्र खर ! आतपासून उमलून येते तीच खरी कविता असा माझा विश्वास आहे.

तर हा माझा प्रवास नवे अनुभव घेत, ते कवितेत शब्दबध्द करत चालू आहे. माझ्याच एका शब्दांवरच्या कवितेने मनोगत संपवते.

“शब्द अडतात, कोडी घातलात, पाठ फिरवतात, कधी कधी ......

शब्द सुचतात , गुंफले जातात , कविता होतात , कधी कधी ......

शब्द रडतात, कासावीस होतात, अश्रू पुसतात , कधी कधी ......

शब्द असतात, फसवून जातात, जखम देतात, कधी कधी ......

शब्द संपतात , धुकं होतात , अंधारतात, कधी कधी ......

शब्द टाळतात , मागे वळतात , भित्रे असतात, कधी कधी ......

शब्द हसतात, मोहरून जातात , प्रेमात पडतात कधी कधी ........

शब्द जमतात , शब्द रमतात , लिहीत बसतात, असचं कधी ......”

--- सुनीती लिमये (पुणे) suniti.limaye@gmail.com

तुच लिहुन द्यायचीस

तुझ्यासकट

या प्रहर-कथा....

ढगांच्या तळहातावर

एखादा ओघळ अडवुन

'आभाळ' थांबवायचीस...

अन..

तो कलंडता जन्म

अस्ताच्या लक्ष वेळा

जगुन घ्यायचा...

तेव्हा ...शांत असायचा (अजुन आहेच...)

स्मरणांच्या

लख्ख प्रदेशातला

अखेर मत्रं गाभारा...

आत भरला वारा..

आत्मलीन...

"सांध्यकळस"

अन, संध्यामग्न दिवस...

अगदी कथेच्या

तु माझ्यासकट

सुचवलेल्या (न ठरलेल्या)

...शेवटापर्यंत.......



--- सचिन काकडे (मुंबई)     sachinskakade@gmail.com

गोळा करून घुंघर, त्याच बनेल झुंबर

सोन झळाळी अंबर , बहाव्याच

फांदीच फांदी पेटली, गुलमोहराची नक्षी

भार पानांचा टाकून, घेतो मशाल हाताशी



एक सावर कापूस , जसा म्हातारा माणूस

अनुभवांचा पाऊस, शिकवतो.

पिंपळाची नवी पान , कधी लालसर

रंग बदलू लागला, झुळुकेन हळुवार

रानजाईचा सुगंध , धुंद झालं सारं रानं

बोलावते मला तेव्हा , पाणी येई डोळ्यातुनं

सा-या सृष्टीचे हे खेळ , नाही कधी थांबणार



तिचं माझं घट्ट नातं , कधी नाही संपणार

ऐन वैशाखात सृष्टी , बघ !   रंगेही , सजेही

माणसाच्या मुला ऐक , तुला काही सांगू पाही

--- सुनीती लिमये (पुणे)

# ऐल-पैल

ऐल मळा पैल तळे
जायचे कुठे ना कळे
टाकता पाऊल वळे
पुन्हा माघारी





ऐल दिवा पैल वात
भेट नाही आयुष्यात
मिट्ट काळोख घरात
अवस दारी

ऐल गंध पैल जाई
मधे गूढ, खोल खाई
आक्रोश घुमत राही
कडेकपारी

ऐल चंद्र पैल निशा
घेरतात सुन्न दिशा
घुमतात वेड्यापिशा
स्वप्नांच्या घारी



ऐल प्राण पैल सखा
जीव भेटीला पारखा
खुपतो काट्यासारखा
सल जिव्हारी

ऐलपैलाच्याही पार
तुझ्या महालाचे दार
त्याच्या पायरीशी थार
दे रे मुरारी

--- क्रांति सडेकर (नागपूर) krantisadekar@gmail.com



# बीज

अंधारल्या जगाच्या साक्षीस बीज होते
आकाश सावराया लघु एक बीज होते

भोळ्यास जीव लावी धूर्तास दे निशाणी
सामावते जगाला संपूर्ण बीज होते

शांतीत लाव ज्वाळा, ज्वाळेत अमृतेही
भासांसवे निराळे उन्माद बीज होते

रोधात आणि माया, मायेत आणि ताठा
निर्माल्यसे उरावे निष्पाप बीज होते

काया मनास जोडी, तोडी मनास गर्वे.
संपूनही दिसावे नितांत बीज होते

होते कुणास ठावे आशीश पामराला
सर्वात व्यापलेले संवाद बीज होते

--संहिता हिस्वनकर (औरंगाबाद)

samhita.hiswankar@gmail.com

## कुणी इतकं गोड का दिसाव ?....

कुणी इतकं गोड का दिसाव ?....

की मुंग्यानीही उपोषण करावं
श्वासागणिक आंदोलन व्हावीत,
काळजाच्या प्रत्येक ठोक्यांची !..

कुणी इतकं गोड का दिसाव ?....
की पेरापेरातून तुकडे व्हावेत ऊसाचे..
पाहताक्षणी वितळून जावा पारा,
तीने पाहिलेल्या प्रत्येक आरशामधला !..



कुणी इतकं गोड का दिसाव ?....

की मिठागराचंही नंदनवन व्हावं
वाळवटांपर्यंत वाहत जाऊन
साखर उधळावी खारट समुद्राने !..

कुणी इतकं गोड का दिसाव ?....
की दगडालाही शृंगार सुचावा
आणि मग कुठल्या गाढवानेही
कविता रचाव्यात घोड्याच्या वेगाने!....

खरचं कुणी ... इतकं गोड का दिसाव ?....

--सुधीर मुळीक, (मुंबई)

sudhirkavyalay@gmail.com

# स्पर्श

माझेच आठवले स्पर्श
जे रानात हरवले होते .
शब्दांच्या गंधामधुनी
तुझ्यात द्रवले होते .

ती सांज बिलोरी ओली
किरणांच्या मागे रान
वार्या वर भिर्बिर्ताना
पदराचा अडके प्राण



टप टप तो अजुन चाफा
देठाशी गंधित पाणी
ही नजर फुलाशी अड़ते
बांधून घे पापणी

चाफ्याचा गंधित दाह
उरात चन्दन हर्ष
जे, रानात हरवले होते
माझेच आठवले स्पर्श

**--- अनुपमा मुंजे (नागपुर)**

**Kanchandeshpande6@gmail.com**



वायुसेनेची गौरवगाथा, गातो आम्ही हर्षाने ।
उल्लंघुनिया नव्या दिशेला, भेदू क्षितिजा गर्वाने ।। ध्रु.।।

स्वयंशिस्तीचे पाईक तुम्ही, मूल्य तयाचे जाणता ।
अनुभवाचे बोल बड्यांचे, नित्यची अंगी बाणता ।।
रुबाब ऐसा या वर्दिचा, शत्रुलाही धाक पड़े ।
शरणागत मग दीन होऊनी, दयेसाठी तो गाई रडे ।। १ ।।

क्षणाक्षणाला, कणाकणाला, वेचुनी घेता ज्ञान नवे ।
तुम्ही जिज्ञासू, ज्ञान पिपासू, वायूसेनेला हेच हवे ।।
ध्वजा कीर्तिची, विश्व नभांगणी, राखुनी आहे वर्चस्व ।
शौर्य, धैर्य अन् स्थैर्यासाठी, झोकुनी देता सर्वस्व ।। २ ।।

उंचावरुनी अचूक हेरुनी, शत्रूवर करता हल्ला ।
नामशेष त्या तिथे करुनी, आक्रमता पुढचा पल्ला ।।
हार, पराभव, भय नि चिंता, शब्द कुणाच्या गावी नसे ।
आल्या क्षणाला जिंकून घेणे, हा तर तुमचा श्वास असे ।। ३ ।।

वेळप्रसंगी गोळी झेलता, निधड्या आपुल्या छातीत ।
प्राणांचेही मोल देऊनी, पुन्हा जन्मता मातीत ।।
भारतभूचे भूषण तुम्ही, कौतुक करण्या सत्पात्र ।
अध्वर्यू तुम्ही वायूदलाचे, जागृतसे दिन-रात्र ।। ४ ।।

बहुमानाची बहु बिरुदे, निष्ठेने तुम्ही भुषविता ।
अत्त्यानंदे पाही क्षण हे, आमुच्यासह तो सविता ।।
"नभः स्पर्शः दिप्तम उत्तम, ब्रीद सार्थकी तुम्ही केले ।
क्षितिजालाही पार करुनी, विश्व नव्याने दावियले ।। ५ ।।

--- उपेंद्र चिंचोरे (पुणे)

chinchoreupendra@yahoo.com

नंदनवन...

तू आणि मी...
जन्मताच सोबत घेवून आलोय..
एक छेदन बिंदू...
जो एकाचवेळी जोडतोय..
आणि वेगळेही करतोय...आपले उभे आडवे
रस्ते...

कुठल्यातरी हमरस्त्यावर..
त्याच त्या बिन्दुजवळ..
थोडीशी अवघडलेली...
काहीच कारण नसताना..
अचानक तुझ्या पाठीमागून चालू लागलेली मी .
आठवते का रे तुला..?
" घाबरू नकोस..माझा त्रास नाही होणार..."
या एका आश्वासनावर...तू मला दिलेली
मोकळीक..
तुझा गावं बघण्याची..आठवते..?

"तू थांब हं सोबत..." गोंधळलेली मी.
" अग एक दिवस हे गावं ओळखेल तुला.." ठाम
तू.

" पण तू..? तू कुठे भेटशील..?"
यावर तुझ ते उत्तर..

त्या २ वाटा...तुझ्यापर्यंत पोहोचणा-या..
एक काळजातून जाणारी..जिथे तू क्वचितच
असणार..
आणि एक मेंदूतून...जिथे तू असणारच असणार..!
मला वेडीला फक्त काळीजच माहित...
कारण..डोक..डोक कधी नव्हतच मला..!

तुझा गावं मात्र अगदी तुझ्यासाखा..
देखणा...आणि एका सूत्रात बांधल्यासारखा...
काय काय गोळा करत गेले मी...
सगळ सगळ पदरात बांधून
घेतलं...अधाश्यासारख..!

पण आता..आता मागे फिरायला हव...
पुन्हा त्याच चौकात...माझ्या गावाकडे जाणा-या
दिशेने...
खर सांगू..मला परतायचच नव्हत...
पण तुझा गावं अलीकडे ओळखेनासा झालाय..
आणि 'आश्रित' म्हणून राहण्यापेक्षा...
परतलेलच बर...हो नं...?

कधी वाट चुकलाच..तर ये एकदा..या
माळरानावर..
नंदनवन झालेलं असेल तोवर...
प्रत्येक दगडाच..!

अन हो...
इथे येताना मात्र एकच रस्ता असेल...तेंव्हाही ...
जिथे अंथरलेल असेल...फक्त काळीज..!



--- ममता सिंधुताई (पुणे)
mamata.riyaj@gmail.com

## परण

धा तिरकिडतक धा
घे....त
धा तिर्रकिडतक धा
धा तिरकिडतक, ता तिर किडतक गदिंत
किडनग
घे....त
धातिरकिडतक, ता तिरकिडतक, तकता तिरकिड
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा

मी मी मी मी म्हणणाऱ्यांनी
क्षणभर थांबुन आत पहावे
ब्रेक घेउनी आत वळावे
शोधावे लपल्या ब्रह्माला
स्पर्श करावा त्या ब्रह्माला
मायेच्या आडून नाचवी
तुला मला अन या विश्वाला
ग्रह ताऱ्यांना
तृणपात्यांना
नाच नाचवी घुमवी फ़िरवी
कधी उजळवी
कधी झाकोळी
कधी उसळवी
कधी कोसळवी
कधी झुलवी कधी झुकवी तुकवी
कधी हसवी कधी रडवी झगडवी
हसण्या रडण्या आडून त्याचे
पदन्यास घे जाणून बंधो
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा

तुला वाटले मी हे केले
तन कष्टवुनी धन निर्मियले
इमारती अन् पूल बांधले
रोप लावले , पाणी घातले
पान फ़ुलांच्या बागेमध्ये
रंग ओतुनी चितारले मी
पक्षी पाने
नक्षी राने
जीव ओतुनी
रक्त आट्वुन
उभारले मी बुरूज किल्ले
या पृथ्वीच्या छाताडावर
पाय रोवुनी
उभारलो मी भव्य गुढीसम
बाहू माझे फ़ुरफ़ुरणारे
धीट मनगटे
घोटीव खांदे
गट्स माझे
मी असा धटिंगण
मल्ल लाल मातिचा मनस्वी
...पण.. चुकता... छातीचा ठोका...एकच..
कोसळतो मलूल मी
असाह्य होतो, गळून पडतो
चार क्षणांतच दुर्गंधीने भरून जातो
चंदन काष्ठांवर भुर भुर्कन जळून जातो
राख चिमुटभर सागर लाटी विरून जातो
माती मध्ये मिळून जातो
मातीमध्ये मळून जातो
संपुन जातो
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा



कोण धटिंगण
कसली गुढी अन कुठला किल्ला
मी तर त्याचा अवयव छोटा
किसी झाडकी पत्ती
बिंदु बाल झाटका
करण्या आलो कार्य नियतीचे
साहेबाने सांगितले ते करीत गेलो
मायेच्या आडून सारखा
ब्रह्म मला हुकुमावत होता
कधी भुकेचे हंटर फ़टके
कधी गाजर कधी रत्न माणके
पळवत होता
हलवत होता
झुलवत होता
काम आपले करवित होता
मायेच्या आडून सारखा
ब्रह्म मला दरडावत होता
हंटर फ़टके हाणत होता
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा
धिक् कडान् तिक कडान् धा
किती क्षुद्र मी
परावलंबी
किंचितशा लोभाच्या साठी
नाक घासतो
सरपटतो गुढघ्यांवर लटपट
याच्या त्याच्या दुत्कारांनी
खिन्न वाकतो
तोंड झाकतो
अंग चिमटुनी बिळात लपतो
क्षुद्र असा मी



.... क्षुद्र ?
क्षुद्र कसा मी ?
मी जर आहे अवयव त्याचा
अवयव "त्याचा" !
क्षुद्र कसा मी ?
ब्रह्म्याचे जरी नख मी असलो...
क्षुद्र कसा मी ?
तेजःपुंजाच्या रक्तातील लाल पेशी जरी...
क्षुद्र कसा मी ?

मी जगतो म्हणुनी तो ब्रह्मा जागा आहे !
मी हलतो म्हणुनी परमात्मा चेतन आहे !
साऱ्या विश्वाच्या बॅलन्सला मीच कारणी !
पत्तीपत्तीचा श्वासाने विश्ववृक्ष हा जिवंत आहे
!
क्षुद्र कसा मी ?
मी परमात्म्याच्या देहाचा आत्मा आहे !
मी "परमात्म्या"च्या देहाचा आत्मा आहे !
मी परमात्म्याच्या देहाचा "आत्मा" आहे !

धिट् खडा धिट् खडा रहे
धिट् खडा धिट् खडा रहे
धिट् खडा धिट् खडा रहे

--- नाम गुम जायेगा (मुंबई)
naamagumjaayegaa@gmail.com



# बारा लाख वाचकांसाठी ई चळवळ

तीन वर्षापूर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना दिडशेहोऊन अधिक पुस्तके विनामुल्य दिली. मोरया , मीरा, कृष्ण, गुरूदेव रविंद्रनाथ, स्वामी विवेकानंद, विंदा करंदीकर, ना. धो. महानोर, ग्रेस, नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे ४०० नविन साहित्यिकांना लोकांसमोर आणले. इंटरनेट्वर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरीरीने पुढे नेली.

प्रेम आणि सौंदर्याबरोबरच आत्महत्या आणि दहशतवाद अशा विषयांवरच साहित्य मांडल. विनोदाला वाहिलेलं ई-श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शस्त्रीय संगीतासाठी संगीत कानसेनअचे वर्ग चालवले.

नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातील किल्यांची माहिती देणा-या पुस्तिका "दुर्ग दुर्गट भारी" द्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगातल्या मराठी मंडळींना उभारी दिली.

लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामुल्य पोचवण्याची आमची परंपराआम्ही अधिक जोमाने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहूदे. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फक्त लाकबर लोकांपर्यंतच मर्यादित का? १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य साहित्य पोचलचं पाहिजे असं नाही वाटत आपल्याला ? आणि त्यासाठी काही फार करायची गरज नाही.

आपल्या ओळखीच्या १२ लोकांची, १२ मराठी लोकांची ईमेल आयडी द्याल?? जास्त दिलीत तरी हरकत नाही पण निदान १२ लोकांची ईमेल आयडी पाठवा. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी १२ आयडी पाठवले तर लाखाचे १२ लाख व्हायला कितीसा वेळ लागणार ? बारा लोकांची मेल आयडी पाठवणा-या वाचकांना आम्ही ई साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे म्हणून मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सुचना मागवत राहू. मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.

**तर होणार ना ई-साहित्य प्रतिष्ठानचे पाठीराखे ??**

**फक्त आपल्या खास मराठी मित्र, नातेवाईकांच्या १२ मेल आयडी खालील पत्त्यावर पाठवा.**

**esahity@gmail.com**

खात्री बाळगा या मेल आयडीचा कोणत्याही प्रकारे गैरवापर केला जाणार नाही. त्यांना जाहिराती अथवा भलभलत्या मेल पाठवून त्रास देणार नाही. याचा उपयोग केवळ चांगले मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.

**:अधिक माहितीसाठी :**

**- संकेत स्थळ -**

**www.esahity.com**

**-फेसबुक –**

**https://www.facebook.com/esahity**